**राज्यातील ग्रामीण कृषि बाजार योजनेचे प्रारुप ठरविण्यासाठी आंतर-विभागीय समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः कृपमं-१२१८/प्र.क्र.२०९ /२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १४ नोव्हेंबर, २०१९

वाचा :-

१. पी.के.स्वाईन, सहसचिव, भारत सरकार यांचे अ.शा. पत्र क्र.२६०११/०१/२०१९-M-II, दिनांक २१.१०.२०१९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करण्यासाठी नेमलेल्या समितीने (DFI) सध्या ग्रामीण स्तरावर नियतकालीन/हंगामी तत्वावर सुरु असलेल्या आठवडी बाजारांचा उपयोग शेतकऱ्यांना त्यांच्या शेता शेजारीच/स्थानिक स्तरावर शेतमाल विक्रीसाठी उपलब्ध करुन देण्याकरीता पायाभुत सुविधा निर्माण करण्याची शिफारस केली आहे. या शिफारशी नुसार केंद्र शासनाने सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पात ग्रामीण कृषि बाजाराची संकल्पना घोषित केली आहे. केंद्र शासनाच्या आंतर-मंत्रालयीन समितीची पहिली बैठक घेण्यात आली, ज्यामध्ये अशी शिफारस करण्यात आली आहे की, राज्यातील संबंधीत विभागांतील विभागांचे प्रमुख यांची समिती गठीत करण्यात यावी. तसेच जिल्हा पातळीवर योजनेचे प्रारुप ठरविण्याकरीता नोडल अधिकारी नियुक्त करण्यात यावे. केंद्र शासनाने सुचित केल्यानुसार संबंधीत राज्याच्या मंत्रालयीन विभागातील विभाग प्रमुख यांची एक आंतर-विभागीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

केंद्रशासनाच्या ग्रामीण कृषि बाजार योजनेचे प्रारुप ठरविण्याकरिता खालीलप्रमाणे आंतर-विभागीय समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | मा.प्रधान सचिव (पदुम व पणन) | - अध्यक्ष |
| २) | मा.प्रधान सचिव (ग्रामविकास) | - सदस्य |
| ३) | मा.सचिव (कृषि) | - सदस्य |
| ४) | मा.सचिव (MANREGS),रो.ह.यो व मृदु व जलसंधारण | - सदस्य |
| ५) | नाबार्डचा प्रतिनिधी | - सदस्य |
| ६) | पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे | - सदस्य |

७) कार्यकारी संचालक,म.रा.कृ.प.मं, पुणे - सदस्य
८) उपसचिव (पणन) - सदस्य सचिव

राज्यात ग्रामीण कृषि बाजार स्थापन करण्याबाबत, योजनेच्या प्रारुप ठरविण्याकरिता व त्याचे व्यवस्थापन करण्याकरीता सदर योजनेचा नोडल विभाग म्हणुन पणन उपविभागाची, नोडल एजन्सी म्हणून पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची नियुक्ती करण्यात येत आहे. व संबंधित सर्व जिल्ह्यातील जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९१११४१६५११५५७००२ असा आहे. हा शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2019.11.14 16:52:30 +05'30'

**( जयंत भोईर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (पणन),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव,(ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव (MANREGS,रो.ह.यो व मृदु व जलसंधारण), मंत्रालय, मुंबई
५. नाबार्डचा प्रतिनिधी (महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ मार्फत)
६. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
८. उपसचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०. निवडनस्ती (२१-स)